महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली सैन्यातील शौर्यपदक/सेवापदक धारकांना अनुदान - कमांडर कौस्तुभ विजयकुमार गोसावी, जिल्हा सातारा.

# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्र.मगौपु-२०१५/प्र.क्र.२६६/२८
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १२ /१०/२०१५.

**वाचा**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. शौपपु-२००८/प्र.क्र.४९/२८, दि.०७.०५.२०११.
२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६२११/प्रस्ताव/गौ.पु/सैकवि-१६, दिनांक २०.०७.२०१५.

**प्रस्तावना**

०३६५७ के कमांडर कौस्तुभ विजयकुमार गोसावी SC,NM यांना, राष्ट्रपती सचिवालयाच्या क्र.१४-प्रेस/२०१५, दिनांक २६ जानेवारी, २०१५ च्या अधिसूचनेन्वये " शौर्य चक्र" हे पदक प्रदान करण्यात आले असल्याने दिनांक ०७.०५.२०११ च्या शासन निर्णयानुसार महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेंतर्गत त्यांना एकरकमी अनुदान देण्याबाबतचा प्रस्ताव सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी संदर्भाधीन दिनांक २०.०७.२०१५ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे. या अनुषंगाने लाभार्थ्यास अनुज्ञेय रक्कम मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

उपरोक्त नमूद शासन निर्णय व प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील तक्त्यात दर्शवल्याप्रमाणे महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली अनुज्ञेय असलेली रु.१०,००,०००/- (रुपये दहा लाख फक्त) इतकी अनुदानाची रक्कम खालील लाभार्थ्यास देण्यास शासनाची मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | शौर्य/सेवापदक धारकाचे पदनाम, नाव व पत्ता | शौर्य/ सेवापदक | पदक प्राप्त झाल्याचा दिनांक | अनुदानाची देय एकूण रोख रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | ०३६५७ के कमांडर कौस्तुभ विजयकुमार गोसावी SC ,NM ६१ कार्तिकेय, नोफ्रा, कुलाबा मुंबई ०५ | शौर्य चक्र पदक | २६जानेवारी, २०१५ | १०,००,०००/- |
| | | | एकूण | १०,००,०००/- |

२. या प्रयोजनार्थ होणारा रुपये १०,००,०००/- (रुपये दहा लाख फक्त) इतका खर्च 'मागणी क्र.ए-४, लेखाशिर्ष २०७५, संकीर्ण सर्वसाधारण सेवा, ८०० - इतर खर्च, (००)(०५) शौर्यासाठी पारितोषिके (२०७५ ०११ ३) ०५ - बक्षिसे' या लेखाशीर्षाखाली सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षाकरीता, मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच सदरचा खर्च हा मासिक निधी विवरणपत्रानुसार करण्याची दक्षता घेण्यात यावी. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, सातारा यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदरची रक्कम जिल्हा कोषागार, सातारा येथून आहरीत करुन संबंधितांना विहीत पध्दतीने वितरीत करण्यात यावी.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. शौपपु-२००८/प्र.क्र.४९/२८, दि.०७.०५.२०११ मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०१४१६२०३७२२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradeep Darade

Digitally signed by Pradeep Darade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pradeep Darade
Date: 2015.10.21 15:26:10 +05'30'

**प्र.ल.दराडे**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा)महाराष्ट्र, मुंबई-३२,

४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,

५. जिल्हाधिकारी, सातारा,

६. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा,

७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००१ ( ५ प्रती),

८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, सातारा,

९. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई ३२,

१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,

११. ०३६५७ के कमांडर कौस्तुभ विजयकुमार गोसावी SC,NM ६१ कार्तिकेय, नोफ्रा, कुलाबा, मुंबई ०५

१२.सग्रहार्थ -(२ प्रती),